**केंद्र शासनाने "Mechanism for marketing of Minor Forest Produce (MFP) through Minimum Support Price (MSP) and development of value chain for MFP" या योजनेच्या अंमलबजावणीकरिता उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमएफपी-१६१४/प्र.क्र.८२/का.३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक- २७ एप्रिल, २०१५.**

**वाचा:-**

१) केंद्र शासनाच्या जनजाती कार्य मंत्रालयाचे पत्र क्रमांक- २/१९/२०१३-सीपी ॲन्ड आर, दि.२५/१/२०१४.

२) केंद्र शासनाच्या जनजाती कार्य मंत्रालयाचे पत्र क्रमांक- २/२१/२०१३-सीपी ॲन्ड आर, दि.२४/३/२०१४.

३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र क्र.- आविम/विप/गौणवनउपज/७७८/१४, दि.१६/०६/२०१४.

**प्रस्तावना:-**

गौण वनोपज खरेदी विक्रीबाबत "Mechanism for marketing of Minor Forest Produce (MFP) through Minimum Support Price (MSP) and development of value chain for MFP" ही योजना केंद्र शासनाने कार्यान्वीत केली आहे. भारतीय राज्यघटनेच्या पाचव्या अनुसूचीत नमूद केलेल्या अनुसूचित क्षेत्रातील अनुसूचित जमातींकरिता व त्या क्षेत्रात मोठ्या प्रमाणात प्राप्त होणाऱ्या १२ गौण वनोपजांकरिता (MFP) ही योजना राबविण्यात येणार आहे.

अनुसूचित जमातीमधील गौण वनोपज गोळा करणाऱ्यांना किमान आधारभूत किंमतीद्वारे (Minimum Support Price) वाजवी मोबदला व आवश्यक पायाभूत सुविधा उपलब्ध करणे तसेच सामाजिक सुरक्षेची खात्री देणे हे या योजनेचे मुख्य उद्दिष्ट आहे. ट्रायफेडकडून उपलब्ध होणाऱ्या सूचना/माहितीद्वारे निवड केलेल्या गौण वनोपजाची आधारभूत किंमत ठरविण्यात येणार असून या आधारभूत किंमतीचे दर तीन वर्षांनी पुनर्विलोकन करण्यात येणार आहे. याकरिता ट्रायफेडकडून संगणकीय प्रणालीद्वारे Trade Information System चा विकास करण्यात येणार आहे.

ही गौण वनोपज योजना हंगाम २०१३-१४ पासून सुरु करण्यात आली असून १२ व्या पंचवार्षिक योजना (सन २०१२ ते २०१७) कालावधीत सदर योजना सुरु ठेवण्यास मंजूर देण्यात आलेली आहे. त्यानंतर योजनेचे मुल्यमापन करुन योजना सुरु ठेवण्याबाबत निर्णय घेतला जाणार आहे. फिरत्या निधीच्या स्वरुपामधील खेळते भाग भांडवल (Working capital in the form of revovlving fund) या योजनेद्वारे उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्याद्वारे केंद्र शासनाचा ७५% व राज्य शासनाचा २५% वित्तीय सहभाग निश्चित करण्यात आलेला आहे. सदर योजनेत होणारा संभाव्य तोटादेखील ७५ : २५ या प्रमाणात अनुक्रमे केंद्र व राज्य शासन यांच्यात विभागला जाणार आहे.

या योजनेच्या अंमलबजावणीकरिता केंद्र शासनाकडून दि. २४/३/२०१४ रोजीच्या आदेशान्वये प्राप्त झालेली रु. ५.०० कोटी इतकी रक्कम खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

गौण वनोपज खरेदी विक्रीबाबत "Mechanism for marketing of Minor Forest Produce (MFP) through Minimum Support Price (MSP) and development of value chain for MFP" या योजनेच्या अंमलबजावणीकरिता केंद्र शासनाकडून दि. २४/३/२०१४ रोजीच्या आदेशान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांच्या खात्यावर जमा झालेली रु. ५.०० कोटी इतकी रक्कम केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र. १ वरील पत्रात नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचनांमध्ये नमूद केलेल्या तरतूदींनुसार खालीलप्रमाणे खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.:-

(रु.लक्ष)

| अ.क्र. | तपशील | किंमत | मंजूर रक्कम |
|---|---|---|---|
| १ | ६० खरेदी केंद्राचे आधुनिकीकरण प्रत्येकी रु.५ लक्ष प्रमाणे | ३००.०० | २२५.०० |
| २ | ५० मेट्रीक टन क्षमतेचे ३४ साठवण गृह प्रत्येकी रु.३.२५ लक्ष प्रमाणे | ११०.५० | ८२.८७ |
| ३ | १० मध क्लस्टर प्रत्येकी रु.५.४८ लक्ष प्रमाणे | ५४.८० | ४१.१० |
| ४ | MFP खरेदी अनुषंगिक खर्च | २४८.५१ | १५१.०३ |
| **एकूण** | | **७१३.८१** | **५००.००** |

२. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १४४/व्यय-१४, दिनांक ३१/३/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२९१२५१४०७४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.04.30 12:16:50 +05'30'

**( सु.ना.शिंदे )**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक
२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
५) वित्त विभाग (व्यय-१४/साउ/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
६) संचालक, लेखापरीक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
७) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.